महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो ( Special Technical Officer-MGNREGA) यांची जिल्हा परिषद आस्थापनेवर ९६ पदे निर्माण करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
### शासन निर्णय क्रमांकः आस्थाप २०१५/प्र.क्र.८८/मग्रारो-३

नवीन प्रशासकीय इमारत, १६ वा मजला, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २४ जुलै, २०१५.

<u>वाचा</u>

१) **शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांकः** मग्रारोहयो-२०१०/प्र.क्र.१२/रोहयो-१४, दि.११.११.२०१०
२) **शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांकः** आकृति-२०११/प्र.क्र.५/मग्रारो-३, दि.३१.०५.२०११
३) **शासन शुद्धीपत्रक नियोजन विभाग क्रमांकः** आकृति-२०११/प्र.क्र.५/मग्रारो-३, दि.२२.०६.२०११
४) **शासन शुद्धीपत्रक नियोजन विभाग क्रमांकः** आकृति-२०११/प्र.क्र.५/मग्रारो-३, दि.१८.०७.२०११
५) **शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांकः** आकृति-२०१०/प्र.क्र.७३/मग्रारो-३, दि.१५.०९.२०११
६) **शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांकः** आस्थाप-२०१३/प्र.क्र.३/मग्रारो-३, दि.२४.०५.२०११
७) **शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांकः** आस्थाप-२०१३/प्र.क्र.२१/मग्रारो-३, दि.२०.०६.२०१३

<u>प्रस्तावना</u>

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या कामात मोठया प्रमाणात वाढ झाल्यामुळे तालुका स्तरावर अंमलबजावणी करतांना क्षेत्रीय यंत्रणावरील कामाचा ताणसुदधा मोठया प्रमाणात वाढलेला आहे व दिवसेंदिवस योजनेचा विस्तार होत आहे. तालुका स्तरावर फक्त अव्वल कारकून हे एकच नियमित पद मंजूर असल्याने तालुका स्तरावर अतिरीक्त अधिका-याचे नियमित स्वरुपात पद निर्माण करण्याची मागणी शासनाकडे करण्यात आली होती. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी तातडीने निर्णय घेण्यासाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या टास्क फोर्स समितीच्या दि. ०६.१२.२०१२ च्या बैठकीत तालुका/पंचायत समिती पातळीवर महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेकरीता विशेष कार्यक्रम अधिकारी-मग्रारोहयो यांची ७५ पदे नायब तहसिलदार संवर्गातून व ७५ पदे गटविकास अधिकारी संवर्गातून अशी एकूण १५० पदे निर्माण करण्यात यावीत असा निर्णय घेण्यात आला होता. त्याअनुषंगाने सादर केलेल्या प्रस्तावास वित्त विभागाच्या उच्चाधिकार समितीने मान्यता दिलेली

असल्याने विशेष कार्यक्रम अधिकारी-मग्रारोहयो (Special Programme Officer-MGNREGA) यांची नायब तहसिलदार, गट-ब या संवर्गातील पदास समकक्ष ७५ पदे, संदर्भाधीन अ.क्र.७ येथे नमूद शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आली होती.

विशेष कार्यक्रम अधिकारी-मग्रारोहयो (Special Programme Officer-MGNREGA) यांच्या नायब तहसिलदार, गट-ब या संवर्गातील निर्माण करण्यात आलेल्या ७५ पदांपैकी २१ पदे रिक्त असल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. तसेच उच्चाधिकार समितीने यापूर्वीच मान्यता दिलेली मात्र अदयापही न भरण्यात आलेली गटविकास अधिकारी संवर्गातील ७५ पदे देखील उपलब्ध आहेत. म्हणजेच मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील टास्क फोर्स समितीने मान्यता दिलेली व सद्य:स्थितीत रिक्त असलेली विशेष कार्यक्रम अधिकारी-मग्रारोहयो (Special Programme Officer-MGNREGA) यांची ९६ पदे उपलब्ध आहेत. क्षेत्रीय स्तरावर कामामध्ये झालेली वाढ व योजनेच्या विस्तारामुळे आवश्यक त्या प्रमाणात पर्यवेक्षकीय तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करणे आवश्यक आहे. आर्थिक वर्ष २०१४-१५ मध्ये राज्यात १०२ तालुक्यांमध्ये प्रत्येकी २ लक्ष पेक्षा अधिक मनुष्यदिन निर्मिती झाली. अशा १०२ तालुक्यांपैकी बहुतांश तालुक्यांना पुरेशा प्रमाणात पर्यवेक्षकीय तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्याच्या उददेशाने वरीलप्रमाणे ९६ पदे जिल्हा परिषद आस्थापनेमधून निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय

- विशेष कार्यक्रम अधिकारी-मग्रारोहयो यांच्या नायब तहसिलदार संवर्गातून भरण्यात आलेल्या ७५ पदांपैकी "प्रपत्र-अ" मध्ये दर्शविलेली २१ पदे सद्य:स्थितीत रिक्त असल्याने, सदर पदे आदेशाच्या दिनांकापासून निरसित करण्यात येत आहेत. निरसित करण्यात आलेली पदे संबंधित विभागीय आयुक्त यांनी यापुढे भरु नयेत.
- सदर पदे निरसित झाल्याने शासन निर्णय क्रमांक आस्थाप-२०१३/प्र.क्र.२१/मग्रारो-३, दि. २०.०६.२०१३ सोबतच्या प्रपत्र-२ मधील मुद्दा क्रमांक १८ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.
- महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत आर्थिक वर्ष २०१४-१५ मध्ये ज्या तालुक्यांमध्ये २ लक्ष पेक्षा जास्त मनुष्यदिवस निर्माण झाले आहेत, त्या तालुक्यांसाठी विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो ( special Technical Officer-MGNREGA) यांची ९६ पदे निर्माण करण्यास या आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे.
- सदर पदे जिल्हा परिषद आस्थापनेवरील कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता व कृषि अधिकारी (पंचायत समिती) संवर्गातील असतील.
- **सदर पदाचे पदनाम "विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो" (Special Technical Officer-MGNREGA) असे करण्यात येत आहे.**

- भविष्यात टप्याटप्याने रिक्त होणाऱ्या विशेष कार्यक्रम अधिकारी - मग्रारोहयो (नायब तहसिलदार संवर्ग) च्या पदावर जिल्हा परिषदेच्या आस्थापनेतून तांत्रिक कर्मचारी नियुक्त करावयाचे आहेत. त्यामुळे नायब तहसिलदार संवर्गातील विशेष कार्यक्रम अधिकारी- मग्रारोहयो यांची पदे रिक्त झाल्यास, त्यावर नव्याने नियुक्ती करण्यात येऊ नये. संदर्भाधीन "वाचा" येथे नमूद केलेल्या अ. क्र. ७ मध्ये नमूद केलेल्या दिनांक २०.०६.२०१३ च्या शासन निर्णया सोबतच्या प्रपत्र-२ मधील मुद्दा क्रमांक १० प्रमाणे विशेष कार्यक्रम अधिकारी- मग्रारोहयो यांना तहसिलदार व गटविकास अधिकारी यांचेकडून प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचे प्रत्यायोजन आपोआप रद्द होतील व सदर अधिकार तहसिलदार व गटविकास अधिकारी यांचेकडे पूर्ववत कायम राहतील. विशेष कार्यक्रम अधिकारी-मग्रारोहयो यांचे पद रिक्त झाल्यावर उक्त दिनांक २०.०६.२०१३ च्या शासन निर्णयासोबतच्या प्रपत्र-२ मधील मुद्दा क्रमांक १८ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी. संबंधित विभागीय आयुक्त यांनी त्यांच्या विभागातील जिल्हयांमध्ये नियुक्त करण्यात आलेल्या विशेष कार्यक्रम अधिकारी- मग्रारोहयो यांच्या पदांचा दरवर्षी नियमित आढावा घ्यावा व रिक्त होणाऱ्या विशेष कार्यक्रम अधिकारी-मग्रारोहयो पदांचा अहवाल आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र, नागपूर कार्यालयास पाठवावा. आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र, नागपूर कार्यालयाने आवश्यकता भासल्यास त्याप्रमाणे विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो, जिल्हा परिषद आस्थापनेकडून नियुक्त करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करणे आवश्यक राहील.
- सदर आदेशान्वये तालुकानिहाय निर्माण करण्यात आलेले विशेष तांत्रिक अधिकारी- मगांराग्रारोहयो ( कनिष्ठ अभियंता/ शाखा अभियंता व कृषि अधिकारी) या दोन्ही संवर्गातील पदाचे विवरण "प्रपत्र-ब" मध्ये दर्शविण्यात आले आहे.
- सदर पदे अस्थायी स्वरुपाची असून, ती तदर्थ तत्वावर (Adhoc Basis) प्रथमत: दोन वर्षासाठी निर्माण करण्यात येत आहेत.
- सदर पदांची मुदत दिनांक ३१.७.२०१७ पर्यंत असेल.
- विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो ( special Technical Officer-MGNREGA) ची पदे कनिष्ठ अभियंता/ शाखा अभियंता अथवा कृषि अधिकारी (पंचायत समिती)या संवर्गातून भरण्यात येतील.
- कनिष्ठ अभियंता/ शाखा अभियंता या पदांची वेतनश्रेणी रु. ९३००-३४८००-ग्रेड पे रु ४३००/ रु. ४४०० अशी असेल. तसेच या पदास वेळोवेळी देय होणारे शासनाचे इतर भत्ते अनुज्ञेय असतील.
- कृषि अधिकारी (पंचायत समिती) या पदाची वेतनश्रेणी रु ९३००-३४८००-ग्रेड पे-रु ४४०० अशी असेल. तसेच या पदास वेळोवेळी देय होणारे शासनाचे इतर भत्ते अनुज्ञेय असतील.

- नियुक्त करण्यात येणा-या विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो यांचे वेतन नियमित कर्मचाऱ्यांप्रमाणेच मुख्यालय असलेल्या पंचायत समिती कार्यालयामार्फत काढण्यात येईल. अशा कर्मचाऱ्यांच्या वेतनावर आर्थिक वर्षात झालेला एकूण खर्च आर्थिक वर्षाच्या शेवटी नरेगा सेल, जिल्हा परिषद मार्फत ६ टक्के प्रशासकीय निधीमधून महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र, नागपूर आयुक्तालयाकडून संबंधित जिल्हा परिषदांना देण्यात येईल. त्यामुळे जिल्हा परिषदांनी सदर बाबीवर यापूर्वी केलेल्या खर्चाचे आपोआप समायोजन होईल.
- जिल्हा परिषदेच्या नरेगा कक्षातील सहायक लेखाधिकारी, जिल्हा परिषदेच्या लेखा शाखेसोबत समायोजनाचे काम त्याच वित्तीय वर्षामध्ये पूर्ण करण्याची दक्षता घेतील.
- सोबत जोडलेल्या "प्रपत्र-ब" नुसार मंजूर करण्यात येत असलेली पदे सक्षम नियुक्ती अधिकारी यांनी प्रचलित सेवा प्रवेश नियमानुसार भरावीत.
- एका विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो यांच्याकडे साधारणत: दोन तालुक्यांचा कार्यभार मुख्य कार्यकारी अधिकारी तथा सहजिल्हा कार्यक्रम समन्वयक, जिल्हा परिषद यांच्या आदेशान्वये सोपविण्यात येईल. अपवादात्मक परिस्थितीत कमी किंवा जास्त तालुक्याचा कार्यभार सोपविण्याचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी तथा सहजिल्हा कार्यक्रम समन्वयक यांना राहतील.
- "प्रपत्र-ब" मध्ये नमूद केल्याप्रमाणे नियुक्त करण्यात येत असलेले विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो हे कृषि आणि स्थापत्य अभियांत्रिकी या दोन प्रवर्गातील आहेत. त्यामुळे कृषि व स्थापत्य अभियांत्रिकी या दोन्ही प्रकारच्या सेवा "प्रपत्र-ब" मध्ये नमूद तालुक्यांना मिळणे अपेक्षित आहे. सदर बाबींचा विचार करुन दोन्ही संवर्गातील विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो यांना योग्यप्रकारे कार्यक्षेत्र मुख्य कार्यकारी अधिकारी तथा सहजिल्हा कार्यक्रम समन्वयक यांना निश्चित करुन द्यावे.

उदा. अकोला जिल्हयातील चार तालुक्यांसाठी दोन कृषि अधिकारी व दोन कनिष्ठ अभियंता/ शाखा अभियंता असे एकूण चार विशेष तांत्रिक अधिकारी म्हणून नियुक्त करण्यात येत आहेत. मुख्य कार्यकारी अधिकारी तथा सहजिल्हा कार्यक्रम समन्वयक यांनी प्रत्येकी दोन तालुक्यांचे दोन गट तयार करावेत. अकोला व पातूर या दोन तालुक्याच्या पहिल्या गटास एक कृषि अधिकारी व एक कनिष्ठ अभियंता/ शाखा अभियंता असे दोन विशेष तांत्रिक अधिकारी नेमावे. अशा नियुक्त कृषि अधिकारी व कनिष्ठ अभियंता / शाखा अभियंता या दोन्ही विशेष तांत्रिक अधिकाऱ्यांनी अकोला व पातूर या तालुक्यातील अनुक्रमे कृषि व स्थापत्य अभियांत्रिकीशी संबंधित सेवा देणे आवश्यक राहील. याच पध्दतीने बार्शी टाकळी व मूर्तिजापूर तालुक्यांच्या दुसऱ्या गटासाठीही अन्य दोन विशेष तांत्रिक अधिकारी यांनी दोन्ही प्रकारच्या सेवा देणे अपेक्षित आहे. म्हणजेच प्रत्येक विशेष तांत्रिक अधिकाऱ्याचे कार्यक्षेत्र दोन तालुके राहतील.

विशेष तांत्रिक अधिकाऱ्यांच्या संख्येप्रमाणे प्रकरणपरत्वे कार्यक्षेत्र निश्चित करण्याबाबतचा निर्णय मुख्य कार्यकारी अधिकारी तथा सहजिल्हा कार्यक्रम समन्वयक, जिल्हा परिषद यांनी घ्यावा. काही प्रकरणांमध्ये विशेष तांत्रिक अधिकारी यांचे कार्यक्षेत्र तीन तालुक्यांचे देखील असू शकेल.

- मुख्य कार्यकारी अधिकारी तथा सहजिल्हा कार्यक्रम समन्वयक, जिल्हा परिषद हे विशेष तांत्रिक अधिकारी यांच्या कार्यक्षेत्रातील तालुक्यांपैकी एका तालुक्याच्या ठिकाणी विशेष तांत्रिक अधिकारी - मगांराग्रारोहयो यांचे मुख्यालय निश्चित करुन देतील. तसेच पंचायत समिती निहाय कामाचे दिवस देखील मुख्य कार्यकारी अधिकारी तथा सहजिल्हा कार्यक्रम समन्वयक, जिल्हा परिषद निश्चित करतील.
- विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो यांच्या रजा व आस्थापनाविषयक बाबी मुख्यालयाचे संबंधित गटविकास अधिकारी यांचेमार्फत हाताळल्या जातील.
- विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो यांचे गोपनीय अहवाल मुख्यालयाचे गटविकास अधिकारी प्रतिवेदित करतील. गोपनीय अहवाल लिहिताना मुख्यालयाच्या गटविकास अधिकारी यांनी कार्यक्षेत्रातील अन्य गटविकास अधिकारी यांचे अभिप्राय मागवून ते विचारात घ्यावेत. असे गोपनिय अहवाल संबंधित उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत / नरेगा) जिल्हा परिषद हे पुर्नविलोकित करतील.
- अभिसरणांतर्गत (Convergence) (उदा. इंदीरा आवास योजना इ.) हाती घेतलेल्या कामांसंबंधीत तांत्रिक बाबी हाताळण्याची जबाबदारी संबंधीत मुळ विभागाची असल्यामुळे ही जबाबदारी विशेष तांत्रिक अधिकारी- मगांराग्रारोहयो यांचेवर सोपविण्यात येवू नये.
- विशेष तांत्रिक अधिकारी- मगांराग्रारोहयो (Special Technical Officer-MGNREGA) यांचा महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेतील सहभाग, कर्तव्ये व जबाबदाऱ्या सदर शासन निर्णयासोबतच्या "प्रपत्र-क" मध्ये दर्शविण्यात आल्या आहेत.
- सदर पदांची उपयोगिता लक्षात घेऊन, योजनेसाठी २ वर्षानंतर पदांची आवश्यकता असल्यास त्याबाबतचा प्रस्ताव आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र, नागपूर यांनी पदांची मुदत संपण्यापूर्वी किमान १ महिना आधी शासनास सादर करणे आवश्यक राहिल.
- महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या कामात होत असलेल्या वाढीमुळे तालुका स्तरावर अतिरिक्त अधिकाऱ्याचे पद निर्माण करणे आवश्यक असल्याने, नायब तहसिलदार गट-ब या संवर्गातून विशेष कार्यक्रम अधिकारी- मग्रारोहयो यांची पदे दिनांक २०.०६.२०१३ च्या शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आली आहेत. त्यांना तहसिलदार व गटविकास अधिकारी यांचेकडून काही अधिकारांचे प्रत्यायोजन करण्यात आले आहे. सदरची पदे निरसित झाल्यामुळे व या शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात येत असलेल्या विशेष तांत्रिक अधिकारी- मगांराग्रारोहयो या पदाची कर्तव्ये विशेष कार्यक्रम अधिकारी- मग्रारोहयो पदापेक्षा वेगळे

असल्याने, विशेष कार्यक्रम अधिकारी- मग्रारोहयो यांना तहसिलदार व गटविकास अधिकारी यांच्या प्रदान करण्यात आलेल्या काही अधिकारांचे प्रत्यायोजन आपोआप रद्द होतील व सदर अधिकार तहसिलदार व गटविकास अधिकारी यांचेकडे पूर्ववत कायम राहतील.

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. या आदेशामुळे नव्याने निर्माण करण्यात आलेल्या विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो (Special Technical Officer-MGNREGA ) या पदावरील शाखा अभियंता/ कनिष्ठ अभियंता आणि कृषि अधिकारी (पंचायत समिती) या संवर्गातील कर्मचारी/ अधिकारी यांच्या नियुक्त्या ग्राम विकास विभागाने /संबंधित विभाग प्रमुखांनी तात्काळ कराव्यात.

३. सदर आदेश महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी तातडीने निर्णय घेण्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या टास्क फोर्स समितीचे अध्यक्ष म्हणून मा. मुख्य सचिव यांनी दिलेली मान्यता व ग्रामविकास विभागाने जिल्हा परिषदेवर कार्यरत असलेल्या शाखा अभियंता/कनिष्ठ अभियंता आणि कृषि अधिकारी या संवर्गातून ९६ पदे निर्माण करण्यास दिलेली मान्यता लक्षात घेऊन निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२४१३०८२२८०१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vimala R

Digitally signed by Vimala R
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vimala R
Date: 2015.07.27 15:52:23 +05'30'

**(आर.विमला)**
उप सचिव (रोहयो).

प्रत,

१. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
२. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
३. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
४. प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई.
५. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

६. सचिव (रोहयो), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
७. सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
८. सचिव (वि.सु.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९. सर्व विभागीय आयुक्त.
१०. सर्व जिल्हाधिकारी (मुंबई शहर व उपनगर वगळून)
११. सर्व उप आयुक्त (रोहयो), विभागीय आयुक्त कार्यालय.
१२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१३. सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो), जिल्हाधिकारी कार्यालय (मुंबई शहर व उपनगर वगळून).
१४. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
१५. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१७. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
१८. सर्व उप सचिव, अवर सचिव व कक्ष अधिकारी (रोहयो प्रभाग), मंत्रालय, मुंबई - ३२.
१९.सारसंग्रहासाठी, मग्रारो-१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**शासन निर्णय क्रमांक : आस्थाप २०१५/प्र.क्र.८८/मग्रारो-३, दिनांक जुलै, २०१५ सोबतचे**

**. प्रपत्र – अ**

**विशेष कार्यक्रम अधिकारी-मग्रारोहयो यांची नायब तहसिलदार संवर्गातून भरण्यात आलेल्या ७५ पदांपैकी रिक्त असलेली २१ पदे निरसित करण्याबाबतचा महसूली विभागनिहाय, जिल्हानिहाय व तालुकानिहाय तपशील.**

**निरसित करावयाची पदे**

| अ. क्र. | महसूली विभाग | जिल्हा | तालुक्यांचे नाव | निर्माण करावयाच्या पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | **कोकण विभाग** | पालघर | जव्हार, विक्रमगड, डहाणू | ०३ |
| २ | | रायगड | पेण | ०१ |
| ३ | **नाशिक विभाग** | नाशिक | पेठ | ०१ |
| ४ | | नंदूरबार | अक्राणी | ०१ |
| ५ | **पुणे विभाग** | पुणे | आंबेगाव, भोर | ०२ |
| ६ | | सांगली | जत, आटपाडी | ०२ |
| ७ | | सोलापूर | माढा, सांगोला | ०२ |
| ८ | **औरंगाबाद विभाग** | औरंगाबाद | सिल्लोड | ०१ |
| ९ | | जालना | मंठा | ०१ |
| १० | | उस्मानाबाद | कळंब | ०१ |
| ११ | **अमरावती विभाग** | अमरावती | मोर्शी | ०१ |
| १२ | **नागपूर विभाग** | नागपूर | काटोल | ०१ |
| १३ | | वर्धा | कारंजा | ०१ |
| १४ | | भंडारा | लाखणी | ०१ |
| १५ | | गोंदिया | तिरोडा | ०१ |
| १६ | | चंद्रपूर | ब्रम्हपुरी | ०१ |
| **निरसित करावयाच्या पदांची एकूण संख्या** | | | | **२१** |

शासन निर्णय क्रमांक : आस्थाप २०१५/प्र.क्र.८८/मग्रारो-३, दिनांक जुलै, २०१५ सोबतचे

. प्रपत्र - ब

विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो (Special Technical Officer-MGNREGA) यांचा सन २०१५-१६ या वर्षासाठी, महसूली विभागनिहाय, जिल्हानिहाय व तालुकानिहाय निर्माण करावयाच्या पदांचा तपशील.

| अ.क्र. | महसूली विभाग | जिल्हा | विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो चे पद मंजूर असलेले तालुके | निर्माण करावयाच्या पदांची संख्या | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | कनिष्ठ अभियंता/ शाखा अभियंता संवर्ग | कृषि अधिकारी संवर्ग | एकूण पदे |
| १ | कोकण | सिंधुदुर्ग | देवगड | १ | -- | १ |
| २ | | पालघर | जव्हार | १ | -- | १ |
| ३ | नाशिक | नाशिक | पेठ | १ | -- | १ |
| ४ | | धुळे | धुळे, साक्री, सिंदखेडा | १ | २ | ३ |
| ५ | | नंदूरबार | अक्राणी, अक्कलकुवा, नवापूर | २ | १ | ३ |
| **६ | | जळगाव | मुक्ताईनगर, चाळीसगाव, पारोळा | १ | १ | २ |
| ७ | | अहमदनगर | पारनेर | १ | -- | १ |
| ८ | पुणे | सांगली | जत, आटपाडी | १ | १ | २ |
| **९ | औरंगाबाद | औरंगाबाद | पैठण, सिल्लोड, वैजापूर | १ | १ | २ |
| १० | | जालना | बदनापूर, भोकरदन, जालना | २ | १ | ३ |
| ११ | | परभणी | गंगाखेड, जिंतूर, पूर्णा | २ | १ | ३ |
| १२ | | हिंगोली | हिंगोली, सेनगाव, औंढा नागनाथ, कळमनुरी | २ | २ | ४ |
| १३ | | बीड | बीड, आष्टी, अंबेजोगाई, गेवराई, केज, पाटोदा, शिरुर(कासार). | ४ | ३ | ७ |
| १४ | | नांदेड | माहूर, नायगाव, उमरी, किनवट, कंधार | ३ | २ | ५ |
| १५ | | उस्मानाबाद | कळंब, परांडा | १ | १ | २ |
| १६ | | लातूर | औसा | १ | -- | १ |
| १७ | अमरावती | अमरावती | चिखलदरा,धारणी, मोर्शी, अचलपूर,चांदूर बाजार, चांदूर रेल्वे | ३ | ३ | ६ |
| १८ | | अकोला | अकोला, बार्शीटाकळी, पातूर, मूर्तिजापूर | २ | २ | ४ |

| अ.क्र. | महसूली विभाग | जिल्हा | विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो चे पद मंजूर | निर्माण करावयाच्या पदांची संख्या | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | कनिष्ठ अभियंता/ शाखा अभियंता संवर्ग | कृषि अधिकारी संवर्ग | एकूण पदे |
| **१९ | | वाशिम | मंगरुळपीर, रिसोड, मालेगाव, मानोरा, वाशिम | २ | २ | ४ |
| २० | | बुलडाणा | लोणार | १ | -- | १ |
| **२१ | | यवतमाळ | बाभुळगाव, यवतमाळ, राळेगाव | १ | १ | २ |
| **२२ | नागपूर | नागपूर | नरखेड, काटोल, रामटेक, भिवापूर, उमरेड | १ | २ | ३ |
| २३ | | वर्धा | कारंजा, हिंगणघाट, सेलू, देवळी | २ | २ | ४ |
| २४ | | भंडारा | मोहाडी, लाखांदूर, भंडारा, पवनी, तुमसर, लाखनी, साकोली | ४ | ३ | ७ |
| २५ | | गोंदिया | अर्जुनी मोरगाव, सालेकसा, तिरोडा, आमगाव, गोरेगाव, देवरी, गोंदिया, सडक अर्जुनी | ४ | ४ | ८ |
| २६ | | चंद्रपूर | ब्रम्हपुरी, नागभीड, चिमूर, मूल, सिंदेवाही, सावली, पोंभुर्णा, गोंडपिंपरी | ४ | ४ | ८ |
| २७ | | गडचिरोली | धानोरा, चामोर्शी, आरमोरी, गडचिरोली, कुरखेडा, देसाईगंज, कोरची, मूलचेरा | ४ | ४ | ८ |
| **एकूण** | | | | **५३** | **४३** | **९६** |

** उक्त जिल्हयांच्या नावासमोर दर्शविलेल्या तालुक्यांमध्ये आर्थिक वर्ष २०१४-१५ मध्ये २ लक्ष पेक्षा जास्त मनुष्य दिवस रोजगार निर्मिती झाली आहे. त्यापैकी संबंधित जिल्हयांसाठी मंजूर करण्यात आलेल्या पदांच्या संख्यांपैकी नेमक्या कोणत्या तालुक्यांमध्ये पद निर्माण करावयाचे आहे याचा निर्णय संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी तथा सहजिल्हा कार्यक्रम समन्वयक यांनी आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र, नागपूर यांचेशी चर्चा करुन घ्यावा.

**<u>प्रपत्र - क</u>**

## विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो (Special Technical Officer-MGNREGA) यांचा महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेतील सहभाग, कर्तव्ये व जबाबदाऱ्या

(१) नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांक : मग्रारोहयो २०१०/प्र.क्र.४७/रोहयो-१०, दिनांक ३.८.२०११ मध्ये नमूद केल्यानुसार तालुकास्तरीय अन्य तांत्रिक अधिका-यांसोबतच विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या कामांना तांत्रिक मान्यता व रेखांकनास (Layout) मान्यता प्रदान करणे आवश्यक राहिल.

(२) विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रात कार्यरत कंत्राटी तांत्रिक अधिकारी यांच्यावर तांत्रिक पर्यवेक्षण करणे, त्यांना तांत्रिक मार्गदर्शन करणे, वेळोवेळी कामाबाबतचा आढावा घेणे आवश्यक राहिल.

(३) विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो यांच्या पर्यवेक्षण व मार्गदर्शनानुसार पंचायत समिती अथवा तहसिल कार्यालयातील महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या अंमलबजावणीसाठी नियुक्त केलेले सर्व कंत्राटी तांत्रिक कर्मचारी कार्यरत राहतील.

(४) विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो हे संबधित मुख्य कार्यकारी अधिकारी तथा सहजिल्हा कार्यक्रम समन्वयक, संबंधित गटविकास अधिकारी आणि सक्षम अधिका-यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकारी यांना तांत्रिक बाबींसंबंधातील अहवाल वेळोवेळी सादर करतील.

(५) मुख्य कार्यकारी अधिकारी तथा सहजिल्हा कार्यक्रम समन्वयक यांनी नियोजन विभाग शासन परिपत्रक क्रमांक : मग्रारो-२०१/प्र.क्र. ५/ पुनर्बा-७/२०१०/रोहयो-१० अ, दिनांक ३०.६.२०१५ नुसार नेमून दिलेल्या कार्यक्षेत्रातील कामांचे चेक मेजरमेंट, विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो घेतील

(६) विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो हे पद फक्त महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेशी संबंधित असल्याने सदर पदावरील अधिका-यास उक्त योजनेव्यतिरिक्त अन्य कामे सोपविण्यात येऊ नयेत. तसेच इतर कोणत्याही पदाचा अतिरिक्त कार्यभार/ पदभार त्यांच्यावर सोपविण्यात येऊ नये.

*************************************